महाराष्ट्र ग्रामदान मंडळास सन २०२१-२२ करिता सहायक अनुदान देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रामदा-२०२०/प्र.क्र.५१/ज-१अ

पहिला मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २२/०२/२०२२

वाचा :-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१४/५/१९७६.
२) महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्र.ग्रामदान-२०१९/प्र.क्र.६३/ ज-१अ, दि.९/८/२०१९.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र-अर्थसं .२०२१.क्र.प्र/४८-अर्थ/३, दि.२४/०६/२०२१
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.ग्रामदा-२०२०/प्र.क्र.५१/ज-१ अ, दि.१९/०७/२०२१
५) महसूल व वन विभाग/कार्यासन ब-२ ची दिनांक २०/०१/२०२२ ची टिपणी
६) महाराष्ट्र ग्रामदान मंडळाचे दि.०६/०१/२०२२ चे पत्र

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन क्र.२, शासन राजपत्रातील अधिसूचना क्र. ग्रामदान-२०१९/प्र.क्र.६३/ज-१अ, दि.०९/०८/२०१९ अन्वये, मा. श्री.जयवंत गंगाराम मठकर यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना करण्यात आलेली आहे. संदर्भाधीन क्र.१, महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीडीएन-१०७४/१६०७/ग-२, दि.१४.५.१९७६ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने, संदर्भाधीन क्र.६ दिनांक ०६/०१/२०२२ च्या पत्रान्वये, महाराष्ट्र ग्रामदान मंडळाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता सहायक अनुदान वितरीत करण्याची शासनास विनंती केलेली आहे.

०२. महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पात रु.२९,७०,०००/- (रुपये एकोणतीस लाख सत्तर हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली होती. त्यानुसार, संदर्भ क्र.४ येथे नमूद दिनांक १९/०७/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सदर अर्थसंकल्पित निधीपैकी रुपये ४,४५,५००/-(रुपये चार लाख पंचेचाळीस हजार पाचशे फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

०३. महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता आता, सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित निधीपैकी माहे जानेवारी,२०२२ मध्ये आणखी रु.७,४२,५००/- (रुपये सात लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यासाकरिता B.E.A.M.S. प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. त्याप्रमाणे, B.E.A.M.S.प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेली रूपये ७,४२,५००/- (रूपये सात लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त) इतकी रक्कम ग्रामदान मंडळास वितरित करण्याकरीता या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली तरतूद "आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा" महसूल व वन विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलांसोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या संगणक संकेतांकांचा न चुकता उल्लेख करावा.

आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.प्र.शां.पाटील, कक्ष अधिकारी, रोख शाखा, महसूल व वन विभाग यांच्या सहीने व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. अतुल कोदे, सह सचिव, महसूल व वन विभाग यांच्या प्रतिस्वाक्षरीने याबाबतचे देयक तयार करून अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे.

०४. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी "सी-५-२२२५-अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण -८०, सर्वसाधारण -८००, इतर खर्च- (००) (००) (०२)- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२२५००६५), १३,कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा. सदर रकमेचा रेखीत धनादेश "अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ (Chairman, Maharashtra Gramdan Mandal)" यांच्या नावे काढण्यात यावा.

०५. अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०२१-२२ करीता वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन,लेखापरीक्षण अहवाल शासनास सादर करावा. तसेच, सदर निधी वितरीत झाल्यानंतर त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

०६. महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२१ च्या अनुषंगाने शासन वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि.२४/०६/२०२१ सोबतच्या परिशिष्ठातील बाब.क्र.३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रस्तुत जुन्या योजनेत्तर योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही. तसेच सदर शासन परिपत्रकातील परिच्छेद ६ ते १२ मधील अटी व शर्तींपैकी "उपयोगिता प्रमाणपत्र" या विषयीची अट या प्रकरणी लागू होत असल्याने महाराष्ट्र ग्रामदान मंडळाने संदर्भाधीन क्र.६ येथे नमूद पत्रान्वये, सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील संदर्भाधीन क्र.४ येथे नमूद शासन निर्णयांन्वये वितरीत केलेल्या निधीचे "उपयोगिता प्रमाणपत्र" विभागास सादर केले आहे.

०७. सदर शासन निर्णय निर्गमित करताना शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम भाग-२, दि.१७/०४/२०१५ भाग पहिला उपविभाग एक अनुक्रमांक-२७, नियम क्रमांक- १४९ मधील अटींचे पालन केले आहे.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२२१२३७२०९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMESH SHIVAJI CHAVAN

Digitally signed by RAMESH SHIVAJI CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ada4e8fa11566f3b9c9f7b5fa123945d54f8e3d5b09d05bedfa09b97ee45cad, pseudonym=8681E76138CFE5A3E889AB0B442F95DD2288C273, serialNumber=EB458B05E05EE27F435BD399537405D44E1C88021CF038B060AC10B9D8FB8787, cn=RAMESH SHIVAJI CHAVAN
Date: 2022.02.22 12:40:27 +05'30'

**( रमेश चव्हाण )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर

२) अधिदान लेखा अधिकारी, मुंबई

३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२.

५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

६) अपर सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२

७) उप सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८) उप सचिव (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

९) सह सचिव (ज-१अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०) श्री.जयवंत गंगाराम मठकर, अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ९-१०, प्रथम, हॅप्पी कॉलनी, कोथरुड, पुणे-३०

११) अवर सचिव (रोखशाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३) अर्थसंकल्प -४/व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) कार्यासन अधिकारी (ल-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१५) श्री. मारोतराव तुळशीराम खैरकर, सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, , मु.पो.नेहरोली, ता.वाडा, जि.पालघर-४२१३१२.

१६) निवडनस्ती (ज-१अ).